जळगांव महानगरपालिका हद्दीतून जाणारे अवर्गीकृत केलेले ६ रस्ते पुन्हा वर्गीकृत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१७/प्र.क्र.२५/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०४ मे, २०१७.

**पहावे :-**

१) शासन निर्णय क्रमांक - रवियो-२०१७/प्र.क्र.२५/नियोजन-२ दि. ३१/३/२०१७
२) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ जळगांव यांचे पत्र क्र. जा.क्र.साबांमंज/रेशा/प्रआ/१९३१/२०१७ दिनांक ०२/०५/२०१७.
३) आयुक्त, जळगाव शहर महानगरपालिकेचे पत्र क्र. जमनपा/सा.बां./५२१/१७-१८, दिनांक- २.५.२०१७.

**प्रस्तावना :-**

जळगांव महानगरपालिकेकडे देखभाल व दुरूस्तीसाठी वर्ग/हस्तांतरीत केलेले एकूण सहा रस्ते अवर्गीकृत करणेबाबतचा प्रस्ताव मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी सादर केला होता. सदर प्रस्तावातील रस्ते, शासन निर्णय क्रमांक- टीआरएस-२००२/प्र.क्र.३५/रस्ते-१, दि.०६/०३/२००२ अन्वये सार्वजनिक बांधकाम विभागाकडून जळगांव नगरपरिषदेकडे सुधारणा, दुरूस्ती व देखभालीसाठी वर्ग करण्यात आलेले आहेत. त्यानुषंगाने जळगांव महानगरपालिकेकडे वर्ग केलेले एकूण सहा रस्ते दि. ३१/३/२०१७ च्या शासन निर्णय क्रमांक - रवियो-२०१७/प्र.क्र.२५/नियोजन-२ या अन्वये अवर्गीकृत करण्यात आले. यासंदर्भात संदर्भ क्र. २ व ३ नुसार केलेल्या पत्रव्यवहाराच्या अनुषंगाने सदरचे अवर्गीकृत ६ रस्ते पुनःश्च वर्गीकृत करण्याचे व महानगरपालिकेच्या ताब्यात न देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. १ चा शासन निर्णय क्रमांक - रवियो-२०१७/प्र.क्र.२५/नियोजन-२ दि. ३१/३/२०१७ रद्द करण्यात येत आहे. आता यापुढे संबधीत रस्ते सार्वजनिक बांधकाम विभागाकडे देखभाल व दुरूस्तीसाठी ताब्यात राहतील.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०५०४१५३०३७२६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.05.04 15:32:40 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

२. विभागीय आयुक्त, नाशिक.
३. अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ,जळगांव (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४. जिल्हाधिकारी, जळगांव
५. आयुक्त,महानगरपालिका जळगांव.
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जळगांव.
७. कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, जळगांव
८. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९. रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०. निवडनस्ती.